**परिविक्षाधीन सहाय्यक जिल्हाधिकारी (भा. प्र. से.) यांच्याकरीता ९ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी-२०१५/प्र. क्र.१५५/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (मुख्य इमारत), मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १३ जुलै, २०१५.

**वाचा:-**

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक. पदनि-२०१२/प्र. क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दि. ११/७/२०१२

२) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. टीआरएन-१०१५/प्र. क्र.२०८/२०१५/दहा, दि. २५/५/२०१५.

**शासन निर्णय:-**

सन २०१४ च्या तुकडीतील परिविक्षाधीन भारतीय प्रशासन सेवेमधील ९ अधिका-यांचे लाल बहादुर शास्त्री राष्ट्रीय प्रशासन अकादमी, मसुरी येथील फेझ-१ चे प्रशिक्षण दि. १२/०६/२०१५ (म. नं.) रोजी संपुष्टात आले आहे. सदर प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर हे अधिकारी त्यांच्या पुढील जिल्हा प्रशिक्षणाकरिता राज्य शासनाकडे रुजू होत आहेत. सदरहू ९ परिविक्षाधीन भारतीय प्रशासन सेवा अधिका-यांच्या जिल्हा प्रशिक्षणासाठी त्यांची परिविक्षाधीन सहाय्यक जिल्हाधिकारी म्हणून त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या जिल्ह्यात पदस्थापना करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर ९ परिविक्षाधीन सहायक जिल्हाधिकारी पदांसाठी खाली नमुद केलेल्या जिल्हाधिकारी कार्यालयांच्या आस्थापनेवर सहायक जिल्हाधिकारी संवर्गात रुपये १५६००-३९१०० ( ग्रेड पे रु. ५४०० ) या वेतनश्रेणीत संबंधित अधिका-यांकरीता दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी पुढील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे ९ अधिसंख्य पदे निर्माण करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.-

| अ. क्र. | भारतीय प्रशासन सेवेतील परिविक्षाधीन अधिकाऱ्याचे नांव | नियुक्तीचा जिल्हा | परिविक्षाधीन कालावधी | |
|---|---|---|---|---|
| | | | पासून | पर्यंत |
| १ | श्री. विपीन विठोबा इटणकर | औरंगाबाद | दि. १/९/२०१४ | दि. ३१/८/२०१६ |
| २ | श्रीमती भाव्या मित्तल | सातारा | दि. १/९/२०१४ | दि. ३१/८/२०१६ |
| ३ | श्री. जलज शर्मा | बीड | दि. १/९/२०१४ | दि. ३१/८/२०१६ |
| ४ | श्रीमती पवनीत कौर | भंडारा | दि. १/९/२०१४ | दि. ३१/८/२०१६ |
| ५ | श्रीमती नीमा अरोरा | यवतमाळ | दि. १/९/२०१४ | दि. ३१/८/२०१६ |
| ६ | श्री. विजय चंद्रकांत राठोड | रत्नागिरी | दि. १/९/२०१४ | दि. ३१/८/२०१६ |
| ७ | श्री. मंताडा राजा दयानिधी | नाशिक | दि. १/९/२०१४ | दि. ३१/८/२०१६ |
| ८ | श्री. अमोल जगन्नाथ येडगे | जळगाव | दि. १/९/२०१४ | दि. ३१/८/२०१६ |
| ९ | श्री. पृथ्वीराज बी. पी. | सोलापूर | दि. १/९/२०१४ | दि. ३१/८/२०१६ |

२. शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार उपरोक्त परिविक्षाधीन सहायक जिल्हाधिकारी यांना महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

३. परिविक्षाधीन सहाय्यक जिल्हाधिकारी यांच्या अधिसंख्य पदावर होणारा खर्च " मागणी क्र. सी-१-२०५३ -जिल्हा प्रशासन (००) ०९३ जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना, १०१ आयुक्त (०१)(०१) आयुक्त कोकण (२०५३ ००२८), (०१)(०२) आयुक्त नाशिक (२०५३ ०४०२), (०१)(०३) आयुक्त पुणे (२०५३ ००६४), (०१)(०४) आयुक्त अमरावती (२०५३ ००८२), (०१)(०५) आयुक्त नागपूर (२०५३ ०१०८), (०१)(०६) आयुक्त औरंगाबाद (२०५३ ०१२६) ०१ वेतन " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून वित्तीय वर्ष २०१५-१६ खालील मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दि. ११/७/२०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१४११२०११४०१५२२१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chandrakant Nivrutti Padale
Date: 2015.07.13 16:09:06 +05'30'

( चं. नि. पाडळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. विभागीय आयुक्त, कोकण/ नाशिक/ पुणे /औरंगाबाद/ अमरावती व नागपूर.
२. जिल्हाधिकारी, औरंगाबाद/ सातारा/ बीड/ भंडारा/ यवतमाळ/ रत्नागिरी/ नाशिक/ जळगाव व सोलापूर.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/सातारा /बीड /भंडारा/ यवतमाळ/ रत्नागिरी/ नाशिक/ जळगाव व सोलापूर.
४. प्रधान महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता व लेखा परीक्षा) महाराष्ट्र -१/२, मुंबई /नागपूर.
५. अप्पर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
६. सामान्य प्रशासन विभाग/ का-१०, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्यासन व्यय-९/वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
८. कार्यासन अधिकारी, कार्यासन ब-१ व इ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.